वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ या संवर्गातून उप मुख्य वास्तुस्त्रज्ञ या संवर्गात पदोन्नती व पदस्थापना.

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक बांधकाम विभाग

**शासन आदेश क्रमांकः पीओजी-१२२२/प्र.क्र. ९/ सेवा-१**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: ८ मे, २०२३

**शासन आदेश :-**

सार्वजनिक बांधकाम विभागातील वास्तुशास्त्रज्ञ संघटनेतील वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ या संवर्गातील अधिकाऱ्यांना दिनांक १.८.२०१४ च्या अधिसूचनेन्वये विहित केलेल्या सेवाप्रवेश नियमानुसार, उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ या पदावर (सुधारित वेतन मॅट्रीक्स एस-२५ : ७८८००-२०९२००) (असुधारित वेतन संरचना पी.बी.-३ वेतन बँड रूपये १५६००-३९१०० ग्रेड वेतन ७६००/-) या वेतनसंरचनेत सन २०२२-२३ च्या निवडसूचीमध्ये ज्येष्ठतेनुसार, निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात रिक्त पदावर पदोन्नती देण्यात येत असून पदोन्नतीउपरांत उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ म्हणून त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर दर्शविलेल्या पदावर करण्यात येत आहे.

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक व दिनांक | अधिकाऱ्याचे नाव | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|
| १ | ३<br>२२.२.२०२३ | श्रीमती माधुरी सुहास कुंभारे | उप मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद (रिक्त पदी) |

२. श्रीम. कुंभारे, वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ यांची सदर पदोन्नती व पदस्थापना पुढे नमूद केलेल्या बाबींच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे :

i. सदर पदोन्नती ही मा. सर्वोच्च न्यायालयातील विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निर्णयास अधीन राहून तसेच रिट पिटीशन स्टँप नं. १०८७६/२०२१ व रिट पिटीशन स्टँप नं. १०८७८/२०२१ मध्ये मा. उच्च न्यायालय, मुंबई यांनी दि. २५.५.२०२१ रोजी दिलेल्या निर्णयानुसार सदर पदोन्नती नमूद रिट याचिकेत होणाऱ्या निर्णयाच्या अधीन राहील.

ii. सदर पदोन्नती ही निव्वळ तात्पुरत्या स्वरुपाची असल्याने पदोन्नतीच्या परिणामी त्यांना नियमितपणाचा व सेवाज्येष्ठतेचा कोणताही हक्क राहणार नाही.

३. श्रीम. कुंभारे यांना देण्यात आलेली सदर पदोन्नती ही कोणतीही पूर्वसूचना किंवा नोटीस न देता रद्द करण्याचा अधिकार शासन राखून ठेवत आहे.

४. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, त्यांनी श्रीम. कुंभारे यांना त्यांच्या नवीन नियुक्तीच्या जागी रूजू होता यावे म्हणून तात्काळ पदमुक्त करावे व नवीन नियुक्तीच्या ठिकाणी हजर होण्यास सांगावे. तसेच, संबंधित अधिकाऱ्यांना पदोन्नतीने पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होण्यासाठी कोणत्या दिनांकास

कार्यमुक्त केले आणि ते पदस्थापनेच्या ठिकाणी कोणत्या दिनांकास हजर झाले याबाबत शासनास doser1.pwd@maharashtra.gov.in या ई-मेल आयडीवर त्वरित अवगत करावे.

५. श्रीम. कुंभारे यांनी कमीत कमी पदग्रहण अवधी घेऊन नव्या पदाचा पदभार स्वीकारावा व आपला पदग्रहण अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा. सदर अधिकारी पदोन्नतीने पदस्थापनेच्या पदावर या आदेशाच्या दिनांकापासून ३० दिवसांच्या विहीत मुदतीत रुजू न झाल्यास त्यांचा अनुपस्थितीचा कालावधी हा अकार्यदिन (dies non) म्हणून गणला जाईल. तसेच, त्यांचे लक्ष महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम-२३ कडे वेधण्यात येत आहे. सदर नियमातील तरतूदी लक्षात घेता, त्यांनी पदस्थापनेत बदल करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील.

६. संबंधित नियंत्रक अधिकाऱ्यांना कळविण्यात येते की, सदर अधिकारी विहीत कालावधीत रुजू न झाल्यास, त्याबाबत शासनास त्वरित अवगत करण्यात यावे, जेणेकरुन संबंधितांविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई त्वरित करणे शक्य होईल. म.ना.से. (रजा) नियम, १९८१ मधील नियम-३० (सी) नुसार त्यांचा रजा अर्ज स्वीकारु नये / मंजूर करु नये.

७. श्रीम. कुंभारे यांनी पदोन्नतीच्या पदावर पदग्रहण केल्यापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेवून करण्यात यावी.

८. श्रीम. कुंभारे यांनी नवीन नियुक्तीच्या पदाचा पदभार स्वीकारल्याचा दिनांक शासनास तसेच संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप, पुणे यांना कळवावा.

९. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०५०८१८०१३७४४१८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

GANGADHAR MAHAJAN GAIKWAD

Digitally signed by GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC WORKS DEPARTMENT,
2.5.4.20=0d38ef6405f5cae15731340f134ce56f50e939ba034b962c317c33ce102270d0, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=5EEEAD19A0EF3D2434AFCCB36079E80E7EDE5A45017EC3297470E90AE602404B, cn=GANGADHAR MAHAJAN GAIKWAD
Date: 2023.05.08 18:01:34 +05'30'

**( गं. म. गायकवाड )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,
२. मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मुख्य वास्तुशास्त्रज्ञ, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
४. मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, मुंबई /कोकण/ पुणे / नाशिक / औरंगाबाद / नांदेड/ अमरावती / नागपूर/ राष्ट्रीय महामार्ग विभाग, नवी मुंबई,
५. मुख्य अभियंता (विद्युत), सार्वजनिक बांधकाम विभाग, मुंबई,
६. संचालक, माहिती तंत्रज्ञान समन्वय केंद्र, हॉटेल सागर प्लाझा समोर, कँप पुणे,

७. सार्वजनिक बांधकाम विभागातील सर्व अधीक्षक अभियंते,
८. श्रीम. माधुरी सु. कुंभारे, वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ, वरिष्ठ वास्तुशास्त्रज्ञ युनिट-१, मुंबई,
९. संचालक, उपवने व उद्याने, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१०. महालेखापाल -२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य, औरंगाबाद,
११. जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद,
१२. सामान्य प्रशासन विभाग, का.-१३/१२/१६-ब, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१४. सचिव ( रस्ते / बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहायक,
१५. सर्व सह सचिव / उप सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. कार्यासन आस्था-१, आस्था- ३, सेवा-६, संगणक कक्ष, रोख शाखा, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई,
१७. निवडनस्ती.